**बुलडाणा जिल्ह्यातील मोताळा तालुक्यातील धामणगांव बढे -रिधोरा खं.-पोफळी - कोल्ही गवळी - आव्हा युनुसपूर - दहिगांव या रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१२२/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ३१ जूलै, २०१८

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.का२(२)/दर्जोन्नती/२०१८/१०५४ दि. २३/०३/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये बुलडाणा जिल्ह्यातील मोताळा तालुक्यातील धामणगांव बढे - रिधोरा खं. - पोफळी - कोल्ही गवळी - आव्हा युनुसपूर - दहिगांव या रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्याचा एकुण होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, बुलडाणा यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, बुलडाणा यांचा ठराव विचारात घेऊन बुलडाणा जिल्ह्यातील मोताळा तालुक्यातील खालील रस्ता दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | धामणगांव बढे - रिधोरा खं. - पोफळी - कोल्ही गवळी - आव्हा युनुसपूर - दहिगांव रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ८७ | (०/०० ते १८/००) १८.०० कि.मी. | २५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९९ |
| | | योजनाबाह्य रस्ता | ( ०/०० ते ७/००) ७.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **२५.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील बुलडाणा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीत **२५.०० कि.मी.** ने वाढ होवून एकुण लांबी (२२२९.०४० + २५.००) म्हणजेच **२२५४.०४० कि. मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग लांबीत **१८.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१५३१.७४० - १८.००) म्हणजेच **१५१३.७४० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०७३११६५५५१४०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d52614 3e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.07.31 16:56:21 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,बुलडाणा.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, बुलडाणा (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलडाणा.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.